फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम २५ (३) अन्वये तात्पुरत्या स्वरुपात कार्यरत विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांच्या फी / मानधनात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र.एसपीपी २००७/२०८३/प्र.क्र.१९९/पोल-१०.
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : ८ डिसेंबर, २००९.

वाचा :- १) शासन पत्र, गृह विभाग क्र.एसपीपी-१०९९/प्र.क्र.९८/पोल-१०, दिनांक २१.८.१९९९.
२) सरकारी अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र.विसअने/१२९/१२९६/२००७, दिनांक २१.६.२००७.

<u>प्रस्तावना</u> :- फौजदारी प्रक्रिया संहिता कलम २५ (३) अन्वये मा. प्रथमवर्ग न्यायदंडाधिकारी न्यायालयात नियमित सहाय्यक सरकारी अभियोक्ता उपलब्ध नसेल तेथे संबंधित जिल्हादंडाधिकाऱ्यांमार्फत विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्ता म्हणून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येते. अशाप्रकारे नियुक्त करण्यात येणाऱ्या विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांना शासन पत्र गृह विभाग क्र.एसपीपी-१०९९ /प्र.क्र.९८/ पोल-१०, दिनांक २१.८.१९९९ अन्वये अदा करावयाचे फी /मानधनाचे दर निश्चित करण्यात आले आहेत. तथापि, फी / मानधनाचे दर सन १९९९ मध्ये निश्चित करण्यात आले असल्याने सरकारी अभियोक्त्यांच्या फी / मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

<u>शासन निर्णय</u> :- फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम २५ (३) अन्वये तात्पुरत्या स्वरुपात कार्यरत विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांना शासन पत्र गृह विभाग क्र.एसपीपी-१०९९/प्र.क्र.९८/पोल-१०, दिनांक २१.८.१९९९ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या आणि त्यांना अदा करावयाचे फी / मानधनाऐवजी खालीलप्रमाणे फी / मानधन मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| (अ) | प्रतिदिनी परिणामकारक सुनावणीसाठी फी | - | रु.४५०/- |
| (ब) | एका जामीन अर्जाच्या विरोधाकरीता | - | रु.२५०/- |
| (क) | प्रतिदिन एकूण कमाल मर्यादा | - | रु.७००/- |

**(टिप : एकापेक्षा जास्त सुनावणी किंवा जामीन अर्जाच्या विरोधाचे काम चालविले तरी प्रतिदिन कमाल मर्यादा रु.७००/- राहील )**

२. उपरोक्त सुधारीत फी / मानधनाचे दर १ नोव्हेंबर, २००९ पासून लागू होतील.

३. यावरील खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, २०१४ न्यायदान (००) (११४), विधी सल्लागार व समुपदेशी (००) (०१) संचालक, सरकारी अभियोग (२०१४ ००२९) या लेखाशिर्षाखालील '०१ वेतन' या उद्दिष्टाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७५/व्यय-७, दि.१४.१०.२००९ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९१२०८१९०५४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

८/१२/२००८

( र. शि. गोरवे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (अवसु) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ /२, मुंबई / नागपूर.
संचालक, सरकारी अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
* उपसंचालक, सरकारी अभियोग संचालनालय, कोकण परिक्षेत्र / अमरावती परिक्षेत्र / नागपूर परिक्षेत्र / नाशिक परिक्षेत्र / पुणे परिक्षेत्र / औरंगाबाद परिक्षेत्र
* सर्व सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता.
वित्त विभाग (सेवा-६), (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
विधी व न्याय विभाग (कार्यासन -१४), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, गृह विभाग (पोल-१०).
* संचालक, सरकारी अभियोग संचालनालय यांचेमार्फत

*****